**कोयना जलविद्युत प्रकल्प स्तर १ व २ अंतर्गत ता. पाटण जि. सातारा मधील पुनर्वसित गावठाणांतील प्रशासकीय मान्यता प्राप्त नागरी सुविधा कामांकरिता निधी मंजुरीबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१७/१०३/प्र.क्र.२८/र-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०२/०५/२०१७

<u>वाचा -</u>

१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र.आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१.८.२००९
२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र.आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८.३.२०११
३) विभागीय आयुक्त, पुणे आदेश क्र. पुनर्व/कावि-४/१४९-१५४/२००८, दि. ०८/०४/२००८
४) जिल्हाधिकारी, सातारा आदेश क्र. पुनर्व/कोयना/कावि/एस.आर.७४, दि. ०३/०५/२०१३
५) जिल्हाधिकारी, सातारा आदेश क्र. पुनर्व/कोयना/कावि/एस.आर.५६, दि. ०३/०५/२०१३
६) जिल्हाधिकारी, सातारा आदेश क्र. पुनर्व/कोयना/कावि/एस.आर.५३, दि. ०३/०५/२०१३
७) जिल्हाधिकारी, सातारा आदेश क्र. पुनर्व/कोयना/कावि/एस.आर.८२, दि. ०३/०५/२०१३
८) जिल्हाधिकारी, सातारा आदेश क्र. पुनर्व/कोयना/कावि/एस.आर.७५, दि. ०३/०५/२०१३
९) जिल्हाधिकारी, सातारा आदेश क्र. पुनर्व/कोयना/कावि/एस.आर.७७, दि. ०३/०५/२०१३
१०) जिल्हाधिकारी, सातारा आदेश क्र. पुनर्व/कोयना/कावि/एस.आर.३९, दि. ०३/०५/२०१३
११) जिल्हाधिकारी, सातारा आदेश क्र. पुनर्व/कोयना/कावि/एस.आर.४३, दि. ०३/०५/२०१३
१२) जिल्हाधिकारी, सातारा आदेश क्र. पुनर्व/कोयना/कावि/एस.आर.६२, दि. ०३/०५/२०१३
१३) जिल्हाधिकारी, सातारा आदेश क्र. पुनर्व/कोयना/कावि/एस.आर.७६, दि. ०३/०५/२०१३
१४) जिल्हाधिकारी, सातारा आदेश क्र. पुनर्व/कोयना/कावि/एस.आर.२९, दि. ०३/०५/२०१३
१५) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अंर्थसं-२०१५/ प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दि.१७/०४/२०१५
१६) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. अर्थसं.२०१२/१२१/प्र.क्र.३९/र-८, दि.३०/०३/२०१२
१७) कार्यकारी अभियंता, कोयना धरण व्यवस्थापन विभाग, कोयनानगर, सातारा यांचे पत्र क्र. कोधव्यविको/प्रशा-२/१८०५/२०१७, दि.११/०४/२०१७

<u>प्रस्तावना -</u>

कोयना जलविद्युत प्रकल्प स्तर १ व २ अंतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. ३ ते १४ च्या आदेशान्वये विभागीय आयुक्त, पुणे/ जिल्हाधिकारी, सातारा यांचे स्तरावरुन प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रशासकीय मान्यता आदेशांनुसार पूर्ण करण्यात आलेल्या तसेच प्रगतीपथावर असलेल्या नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी एकूण रु. ४२.६९ लक्ष चा निधी मागणी प्रस्ताव कार्यकारी अभियंता, कोयना धरण व्यवस्थापन विभाग, कोयनानगर, सातारा यांनी त्यांच्या दि. ११/०४/२०१७ रोजीच्या संदर्भाधिन क्र. १७ च्या पत्रान्वये शासनास सादर केला होता.

२. त्यानुसार, कोयना जलविद्युत प्रकल्प स्तर १ व २ अंतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील प्रशासकीय मान्यता प्रदान नागरी सुविधा कामांकरिता प्रकल्पयंत्रणेने प्रस्तावित केल्यानुसार कामांच्या पुर्णत्वानुसार/प्रगतीनुसार निधी उपलब्ध करुन देण्याचे शासनाच्या विचाराधिन होते.

**शासन निर्णय -**

तदनुषंगाने, कोयना जलविद्युत प्रकल्प टप्पा क्र. १ व २ अंतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील पुर्ण झालेल्या/ प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांसाठी मागणी करण्यात आलेला एकूण रू. ४२.६९ लक्ष निधी सन २०१७-१८ या चालू वित्तीय वर्षात खर्च करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**२. तदनुसार, शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, कोयना जलविद्युत प्रकल्प टप्पा क्र. १ व २ अंतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील पुर्ण झालेल्या/प्रगतीपथावर असलेल्या नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी योजनेंतर्गत सन २०१७-२०१८ या वित्तीय वर्षात BDS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रु. ४२.६९ लक्ष (रुपये बेचाळीस लक्ष एकोनसत्तर हजार फक्त ) एवढा निधी " मागणी क्रमांक सी, १०-४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (योजनांतर्गत) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, पुणे यांना खालील अटींच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.**

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, पुणे यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित अधिक्षक अभियंता, सातारा सिंचन मंडळ, सातारा यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BDS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) अधिक्षक अभियंता, सातारा सिंचन मंडळ, सातारा यांनी नागरी सुविधा कामांसाठी वितरीत सदरचा निधी विभागीय आयुक्त, पुणे यांचेकडून प्राप्त होताच संबंधित कार्यकारी अभियंता, कोयना धरण व्यवस्थापन विभाग, कोयनानगर यांचेकडे पतपत्र LOC व्दारे विनाविलंब वितरित करावा.

३) नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन दिला जात असल्याने नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून कोणतीही परवानगी/मंजुरी घेण्याची आवश्यकता नाही.

४) कार्यकारी अभियंता, कोयना धरण व्यवस्थापन विभाग, कोयनानगर यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, पुणे तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांना सत्वर सादर करावा.

५) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) मंजूर निधी शासनाच्या पुर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

७) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प,५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (योजनांतर्गत) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

८) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००)(०३)इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (योजनांतर्गत) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

९) मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र. सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (योजनांतर्गत) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

१०) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

११) संबंधित अधिक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावीत.

१२) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०१७-२०१८ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५०२१६५२३८६४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pravin R Mundhe

Digitally signed by Pravin R Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pravin R Mundhe
Date: 2017.05.02 16:55:59 +05'30'

(प्रविण रा. मुंढे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन), पुणे विभाग,
२. उप आयुक्त (पुनर्वसन), पुणे विभाग
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उप संचालक, सातारा
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)

५. महालेखापाल ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
६. अधिक्षक अभियंता, सातारा सिंचन मंडळ, सातारा
७. कार्यकारी अभियंता , कोयना धरण व्यवस्थापन विभाग, कोयनानगर
८. जिल्हा कोषागार अधिकारी , सातारा
९. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२
१०. नियोजन विभाग, कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
११. महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई ३२.
१२. महसूल व वन विभाग, पी.ए.सी. कार्यासन , मंत्रालय, मुंबई ३२.
१३. निवडनस्ती र-८, कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

* * *

**शासन निर्णय क्र. पुनर्व-२०१७/१०३/प्र.क्र.२८/र-८, दि. ०२/०५/२०१७ सोबतचे विवरणपत्र**

**कोयना जलविद्युत प्रकल्प टप्पा क्र. १ व २ प्रकल्पांतर्गत सातारा जिल्हयातील पाटण तालुक्यातील पुर्ण/प्रगतीपथावर असलेल्या नागरी सुविधा कामांसाठी वितरीत निधीचा तपशील.**

| अ क्र | पुनर्वसित गावाचे नाव | नागरी सुविधा काम | वितरीत निधी (रु. लक्ष) |
|---|---|---|---|
| **अ) पुर्ण झालेली कामे** | | | |
| १) | तळोशी गोषटवाडी (शिंदेवाडी खांडेकरवाडी) | ग्रॅव्हिटी पाणीपुरवठा योजनेचे बांधकाम करणे | २.७९ |
| २) | नहिंबे तामकणे | अंतर्गत रस्ता करणे | ४.३९ |
| ३) | चिरंबे-विहे | स्मशानभूमी रस्ता | ४.६० |
| **ब) प्रगतीपथावरील कामे** | | | |
| ४) | ढोकावळे-रिसवड | पोहोच रस्ता कि.मी २ मध्ये सा.क्र.१/०१५ ते १/२५५ मी. मधील मातीकाम करणे | ७.६९ |
| ५) | ढोकावळे- रिसवड | पोहोच रस्ता कि.मी १ मध्ये ०/०३५,०/३९० व ०/२२५ मी. मध्ये मोरीकाम करणे | ३.७२ |
| ६) | ढोकावळे- रिसवड | पोहोच रस्ता कि.मी २ मध्ये १/०३०, १/०७५, १/११५, १/३९० व १/७०० मी. मध्ये मोरीकाम करणे | ७.२६ |
| ७) | चिरंबे-काडोली | अंतर्गत रस्ता, स्मशानभूमी पोहोच रस्ता व बसथांबा करणे | ६.२६ |
| ८) | रोहिने-काडोली | बसथांबा, अंतर्गत रस्ता, स्मशानभूमी शेड बांधणे | ५.९८ |
| | | **एकूण अ) + ब)** | **४२.६९** |

Pravin R Mundhe

Digitally signed by Pravin R Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pravin R Mundhe
Date: 2017.05.02 16:56:13 +05'30'

**( प्र.रा. मुंढे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन